**सीसीटीएनएस प्रकल्पाची प्रभावी अंमलबजावणी व त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी कृती दल (Task Force) गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३६१५/प्र.क्र.९०/भाग-१/पोल-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: ०३ मार्च, २०१७

<u>वाचा</u> :

१) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांची क्र.सीएमओ/प्रशासन कक्ष/टिप्पणी/जा.क्र.५८०/२०१६, दिनांक १५.११.२०१६ ची टिप्पणी.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.सायबर व म.अ.प्र/सीसीटीएनएस/२०१६/१८७९, दिनांक २८.१२.२०१६.

<u>प्रस्तावना</u> :

केंद्र शासनाच्या ई-गर्व्हनन्स योजनेतंर्गत गुन्हा व गुन्हेगारी माग काढण्यासाठी नेटवर्क व यंत्रणा (Crime and Criminal Tracking Network and System) हा प्रकल्प Mission Mode Project म्हणून संपूर्ण देशामध्ये राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पांतर्गत गुन्हा व गुन्हेगारांच्या माहितीची देवाण-घेवाण करण्यासाठी राज्यातील सर्व पोलीस ठाणी, घटक कार्यालये, परिक्षेत्र कार्यालये, पोलीस उप आयुक्त कार्यालये/सहाय्यक पोलीस आयुक्त कार्यालये, राज्य गुन्हे अभिलेख केंद्र, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे व पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई ही सर्व कार्यालये सदर यंत्रणेद्वारे देशातील सर्व पोलीस ठाणी व इतर वरिष्ठ कार्यालयांशी जोडली जात आहेत. महाराष्ट्रातील सर्व पोलीस ठाणी व सर्व वरिष्ठ कार्यालये या नेटवर्क यंत्रणेव्दारे जोडण्यात आली आहेत.

सीसीटीएनएस प्रकल्पाअंर्तगत महाराष्ट्र राज्याने विशेष प्रगती केली असून गुन्हे प्रकटीकरण, पुरावा जमा करणे व राज्यातील सर्व पोलीस ठाण्यांमधील गुन्हेगारांची माहिती प्रत्येक पोलीस ठाण्यामध्ये उपलब्ध करणे तसेच न्यायालयामध्ये अपराध सिध्दतेचे प्रमाण वाढविणे याकरीता सीसीटीएनएस प्रकल्पामध्ये विविध उपाययोजना करणे आवश्यक आहे. त्यानुसार सीसीटीएनएस प्रकल्पाची प्रभावी अंमलबजावणी व त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी कृती दल (Task Force) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:**

राज्यातील सीसीटीएनएस प्रकल्पाची प्रभावी अंमलबजावणी व त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी कृती दल (Task Force) गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कृती दलाची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई | - | अध्यक्ष |
| २. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| ३. अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे प्रतिनिधी | - | सदस्य |
| (अ.क्र. २ व ३ मधील प्रतिनिधी पोलीस अधीक्षक किंवा त्यावरील दर्जाचे अधिकारी असतील) | | |
| ४. संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई (किंवा त्यांचे प्रतिनिधी म्हणून सह संचालक दर्जाचे अधिकारी / सल्लागार जे सदर विषयामधील तज्ञ असतील) | - | सदस्य |
| ५. माहिती तंत्रज्ञ (Data Scientist) / संबधित विषयातील तज्ञ | - | सदस्य |
| ६. पोलीस अधीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई | - | सदस्य सचिव |

३. सदर कृती दलाचे मुख्यालय विशेष पोलीस महानिरीक्षक सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, मंत्रालय, मुंबई यांच्या कार्यालयाच्या ठिकाणी राहील.

४. सदर कृती दलाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

(i) विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर) व त्यांची चमू सीसीटीएनएस आधार सामग्री (DATA) च्या आधारे अँप्लिकेशन्स विकसित करण्याचे काम करतील. याकरिता आवश्यक आधार सामग्री (DATA) तसेच सदर अँप्लिकेशन्स विकसित करण्यासाठी आवश्यक असणारे हार्डवेअर, मनुष्यबळ राज्य गुन्हे अभिलेख केंद्राने विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर) यांना उपलब्ध करून दयावे.

(ii) विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर) यांनी विकसित केलेल्या ॲप्लिकेशन्सची चाचणी करून ते उपयोगासाठी अंतिम करण्याकरिता राज्य गुन्हे अभिलेख केंद्र व विशेष पोलीस महानिरीक्षक (सायबर) यांनी एकत्रितपणे काम करावे.

५. उपरोक्तप्रमाणे कार्यवाहीच्या अनुषंगाने स्पष्ट करण्यात येते की, सीसीटीएनएस प्रकल्पाचे दैनंदिन कार्यान्वयन, देखभाल आणि प्रासंगिक सुधारणा या बाबी राज्य गुन्हे अभिलेख केंद्राकडे राहतील. प्रासंगिक सुधारणांमध्ये नवीन ठिकाणी सीसीटीएनएस कार्यान्वित करणे, केंद्र शासनाकडून वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या विकसीत सॉफ्टवेअरची अंमलबजावणी करणे यांचा समावेश असेल. तसेच सद्यस्थितीतील पेंटाहो सॉफ्टवेअर आधारित कामकाज देखील राज्य गुन्हे अभिलेख केंद्राकडे राहील.

६. सदर कृती दलाच्या वेळोवेळी होणाऱ्या बैठकांसाठी सर्व संबधितांनी हजर रहावे. तसेच सदर समितीमध्ये आवश्यकतेनुसार इतर अधिकाऱ्यांना आमंत्रित करण्याचे अथवा उपसमिती नेमण्याचे अधिकार विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष यांना देण्यात येत आहेत.

७. सीसीटीएनएस प्रकल्पाचे प्रकल्प समन्वयक मे. विप्रो कंपनीचे वरिष्ठ तंत्रज्ञ व प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीचे प्रधान सल्लागार/वरिष्ठ सल्लागार यांच्या सेवा आवश्यकतेनुसार कृती दलास उपलब्ध करुन घेता येतील.

८. सदर समितीवर होणारा खर्च मागणी क्र.१, २०५५- पोलीस (००) ११५, पोलीस दलाचे आधुनिकीकरण (०१) विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प (०१) (०१) तंत्रज्ञान विकास प्रकल्प (२०५५ ए०३२), ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच आवश्यकतेनुसार निधीच्या मागणीबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१६३४५६४७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2017.03.03 16:39:34 +05'30'

**( धीरज कां. अभंग )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. अपर पोलीस महासंचालक, राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. विशेष पोलीस महानिरीक्षक, एस.सी.आर.बी., पुणे.
१३.प्रमुख सल्लागार, मे. पिडब्ल्युसी, मुंबई.
१४. प्रोग्राम मॅनेजर, विप्रो.
१५. प्रोग्राम मॅनेजर, बीएसएनएल, पुणे.
१६. महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई यांचे प्रतिनिधी.
१७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१९.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. निवडनस्ती, पोल-३

*****